# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन ज्ञापन क्र. पूरक-०१२१/प्र.क्र.३२१/पोल-७**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १८ फेब्रुवारी, २०२२.

विषय:- **पोलीस अधीक्षक, पुणे ग्रामीण यांचे अधिपत्याखालील बारामती येथील अपर पोलीस अधीक्षक, बारामती शहर पोलीस स्टेशन व वाहतूक शाखेच्या इमारतीचे उर्वरित बांधकाम पूर्ण करण्याकरिता (१) फर्निचर, अंतर्गत रस्ते, संरक्षक भिंत, बाह्य सुशोभिकरण इ. कामासाठी** व **(२) कँटिन इमारत, बाहय सुशोभिकरण, मुख्य इमारतीचे परगोला भराव करणे, रिटेनिंग वॉल इ. बांधकामासाठी निधी वितरण करण्याबाबत.**

संदर्भ:- १. शासन ज्ञापन, गृह विभाग क्र. पोप्रमा-०१२१/प्र.क्र.३२३/पोल-७, दि.१५/१२/२०२१
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.पूरक-०१२१/प्र.क्र.५८/अर्थ-३, दिनांक २८ जानेवारी, २०२२

**ज्ञापन** :-

पोलीस अधीक्षक, पुणे ग्रामीण यांचे अधिपत्याखालील बारामती येथील अपर पोलीस अधीक्षक, बारामती शहर पोलीस स्टेशन व वाहतूक शाखेच्या इमारतीचे उर्वरित बांधकाम पूर्ण करण्याकरिता (१) फर्निचर, अंतर्गत रस्ते, संरक्षक भिंत, बाह्य सुशोभिकरण इ. कामासाठी व (२) कँटिन इमारत, बाहय सुशोभिकरण, मुख्य इमारतीचे परगोला भराव करणे, रिटेनिंग वॉल इ. बांधकामासाठी एकूण रु.१२,७८,४२,३७८/- इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास शासन ज्ञापन, गृह विभाग क्र.पोप्रमा-०१२१/प्र.क्र.३२३/पोल-७, दि.१५ डिसेबर, २०२१ द्वारे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

२. **उक्त कामासाठी,** गृह विभाग- **"मागणी क्र.बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) (११) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण पोलीस विभागाच्या कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे (कार्यक्रम), (४०७० ०२११), ५३, मोठी बांधकामे,"** या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या चालू वित्तीय वर्षात पुरक अनुदान म्हणून **₹१,२७,८४,०००/- (रुपये एक कोटी सत्तावीस लाख चौऱ्याऐंशी हजार फक्त**) इतकी रक्कम पोलीस महासंचालय, म.रा., यांना अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि सनियुत्रण प्रणालीवर वितरण करण्यास, याद्वारे मंजुरी देण्यात येत आहे.

**३.** उक्त रक्कम **₹ १,२७,८४,०००/- (रुपये एक कोटी सत्तावीस लाख चौऱ्याऐंशी हजार फक्त**) अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरित करण्यासाठी **पोलीस महासंचालक, म.रा., मुंबई** यांना **"नियंत्रक अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे. तर त्यांच्या अधिनस्त आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना **"आहरण व संवितरण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**४.** हे ज्ञापन वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२६/२०२२/व्यय-७, दिनांक ०२.०२.२०२२, अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२२०२१८१५१६११०६२९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GAIKWAD KAILAS ARJUN

Digitally signed by GAIKWAD KAILAS ARJUN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, pseudonym=98E519306D20397D354BD181099105F0AC1EFDEC, serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=GAIKWAD KAILAS ARJUN
Date: 2022.02.18 15:17:58 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४) कार्यासन अधिकारी (अर्थसं.-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) पोलीस अधिक्षक, पुणे ग्रामीण
६) निवड फाईल (पोल-७).